**नवी मुंबईतील कांदळवन संरक्षणासाठी सनियंत्रण समिती गठीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एस-३०/२०१५/प्र.क्र.४६२/फ-३**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,

दिनांक : ३ ऑक्टोबर, २०१५.

पहा :-

१) मा.उच्च न्यायालयातील जनहित याचिका क्र. २९८/२०१३ मधील दिनांक ३ व ४ ऑगस्ट, २०१५ चे अंतरिम आदेश.

२) मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई यांचे क्र. कक्ष-३/जमीन/११०/सन २०१५-१६, दिनांक २९.०९.२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्र. २९८/२०१३ मध्ये याचिकाकर्ते नवी मुंबई एनव्हायमेंट प्रिझरवेशन सोसायटी यांची याचिकेतील प्रमुख मागणी अशी आहे की, नवी मुंबई येथील ज्या ठिकाणी डेब्रिज टाकून कांदळवन नष्ट केले आहे, तेथील डेब्रिज काढून पुन्हा कांदळवनाची लागवड करावी. तसेच नवी मुंबई येथील सर्व ठिकाणाच्या कांदळवनाचे संरक्षण करावे.

सदर जनहित याचिकेची सुनावणी दिनांक ३ व ४ ऑगस्ट, २०१५ रोजी मा.न्यायालयापुढे झाली असता. मा.न्यायालयाने या संदर्भात अंतरीम आदेश दिलेले असून त्यातील परिच्छेद २६ (vi) खालील प्रमाणे आहे -

*"We direct the State Government to constitute a Committee headed by the Divisional Commissioner, Konkan Division. The committee shall consist of one Senior officers each of the CIDCO, the NMMC and the Forest Department. The nomination shall be made by the respective authorities within one month form today. The Officers so nominated shall be higher in rank than the rank of the Nodal Officers. We direct that a Deputy Commissioner of Police nominated by the Commissioner of Police of Navi Mumbai shall be also a member of the Committee headed by the Divisional Commissioner. The Nodal Officer of the CIDCO, the NMMC and Forest Department shall be entitled to attend the meetings of the Committee as Special Invitees. We direct the Divisional Commissioner to appoint representatives of one or two NGOs including the first Petitioner working in the field of environment as members of the Committee. In any event, a representative of the first Petitioner shall be invited to attend all the meetings of the Committee as a Special invitee. "*

नवी मुंबई शहरास सुमारे १५० कि.मी. लांबीचे खाडी क्षेत्र आहे. त्यामुळे एवढया मोठया क्षेत्रावर असलेल्या कांदळवनाचे संरक्षण करण्याची व्याप्ती मोठी आहे. म्हणून न्यायालयाने विभागीय आयुक्त, कोंकण विभाग यांचे अध्यक्षतेखाली एक संनियंत्रण समिती गठीत करण्याचे आदेश दिलेले आहेत. सदर आदेशाच्या अनुषंगाने नवी मुंबईतील कांदळवन संरक्षणासाठी सनियंत्रण समिती गठीत करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा.उच्च न्यायालयाच्या उपरोक्त अंतरिम आदेशाचे अनुषंगाने नवी मुंबईतील कांदळवन संरक्षणासाठी सनियंत्रण समिती पुढील प्रमाणे गठीत करण्यात येत आहे -

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | समितीतील स्थान |
|---|---|---|
| ७१ | विभागीय आयुक्त कोंकण विभाग, नवी मुंबई. | अध्यक्ष |
| २ | पोलीस उपआयुक्त, विशेष शाखा नवी मुंबई | सदस्य |
| ३ | अपर आयुक्त, नवी मुंबई महानगर पालिका | सदस्य |
| ४ | महाव्यवस्थापक, पर्यावरण व वने सिडको | सदस्य |
| ५ | विभागीय वन अधिकारी, मुंबई कांदळवन संधारण घटक | सदस्य सचिव |
| ६ | नवी मुंबई एन्वारमेंट प्रिझरवेशन सोसायटी यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ७ | विभागीय आयुक्त, कोंकण यांनी नामनिर्देशित केलेले पर्यावरण क्षेत्रात काम करणारी अशासकीय संस्था (NGO) यांचे प्रतिनिधी | सदस्य |

<u>समितीचे कार्य</u> -

१) सदर समिती मा.उच्च न्यायालयाने वेळोवेळी पारित केलेल्या आदेशाची अंमलबजावणीचे सनियंत्रण करण्यास जबाबदार असेल.

२) मा.उच्च न्यायालयाच्या आदेशाची अंमलबजावणी बाबत नवी मुंबई महानगर पालिका आणि सिडको यांच्या मध्ये कार्यक्षेत्राबाबत (Jurisdiction) काही वाद निर्माण झाल्यास समितीने वादाचे निरसन करावे. समितीचे निर्णय नवी मुंबई महानगर पालिका आणि सिडको वर बंधनकारक राहतील.

३) सदर समितीने महिन्यातून किमान एक वेळा बैठक घेऊन मा.उच्च न्यायालयाने वेळोवेळी दिलेल्या आदेशांच्या अंमलबजावणी बाबतच्या कामाचा आढावा घ्यावा.

४) सर्व यंत्रणा उदा. सिडको, नवी मुंबई महानगर पालिका, वन विभाग व पोलीस या मध्ये योग्य समन्वय राहील, याची जबाबदारी समितीची राहील.

५) समितीच्या बैठकीत नवी मुंबई महानगर पालिका, सिडको व वन विभागाचे केंद्रस्थ अधिकारी (Nodal Officers) हे विशेष निमंत्रित म्हणून आमंत्रित केले जातील.

६) नवी मुंबई येथील ज्या ठिकाणी डेब्रिज टाकून कांदळवन नष्ट केले आहे. तेथील डेब्रिज काढून पुन्हा कांदळवनाची लागवड केली जाईल, याबाबत समिती सुनिश्चिती करेल.

७) समिती गठीत झाल्यानंतर विभागीय आयुक्त, कोंकण यांनी सदर समितीची पुरेशी प्रसिध्दी करावी. समितीकडे नागरीकांना आपल्या लेखी तक्रारी नोंदविता येतील. समितीकडे तक्रारी नोंदविण्याचे विविध मार्ग नागरिकांना प्रसिध्दीद्वारे कळवावे.

८) मा.उच्च न्यायालयाच्या अंतरिम आदेशाची अंमलबजावणी करताना काही अडचणी उदभवल्यास विभागीय आयुक्त, कोंकण यांनी त्याबाबत शासकीय अभियोक्ता यांच्यामार्फत मा.न्यायालयास निदर्शनास आणून द्यावे.

९) समितीने केलेल्या कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल प्रत्येक वर्षाच्या जानेवारी व जून च्या पहिल्या आठवडयात मा.उच्च न्यायालयास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५१००३१६४५०३१४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.10.03 16:49:12 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )

मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रायल, मुंबई-३२.
२) अपर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रायल, मुंबई-३२.
३) प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रायल, मुंबई-३२.
४) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) विभागीय आयुक्त, कोंकण, नवी मुंबई.
१) आयुक्त, नवी मुंबई, महानगर पालिका.
२) पोलीस आयुक्त, नवी मुंबई.
३) व्यवस्थापकीय संचालयक, सिडको, नवी मुंबई.
४) अपर मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई.
१२) मुख्य वनसंरक्षक, कांदळवन कक्ष, मुंबई.
१३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे / कोल्हापूर.
१४) सर्व संबंधित उप वनसंरक्षक.